२०२००९०८११३५२४३७१७

राज्यात मास्क (२ प्लाय, ३ प्लाय व एन ९५) चे दर निश्चित करणेबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**गो. ते. रुग्णालय संकुल इमारत,**
**१० वा मजला, मंत्रालय, मुंबई ४०० ००१.**
**शासन निर्णय क्र. कोरोना-२०२०/प्र.क्र.३०६/आरोग्य- ५**
**दिनांक : २० ऑक्टोबर, २०२०**

संदर्भ :-

१) The Epidemic Act, 1897
२) The Essential Commodities Act,1955,
३) The Prevention of Black Marketing and the Maintainance of supplies of Essential Commodities Act, 1980,
४) The competition Act, 2002,
५) The Legal Metrology Act, 2009
६) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. कोरोना-२०२०/प्र.क्र.३०६/आरोग्य- ५, दिनांक ३१.०७.२०२०.
७) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन आदेश क्र. कोरोना-२०२०/प्र.क्र.३०६/आरोग्य- ५, दिनांक २८.०८.२०२०.

प्रस्तावना :-

कोवीड-१९ साथरोगापूर्वी व कोवीड-१९ साथरोगानंतर हॅण्ड सॅनिटायझर व मास्क (२ प्लाय, ३ प्लाय व एन ९५) यांच्या किमतीत प्रचंड प्रमाणात वाढ झाल्याचे निदर्शनास आले. तसेच केंद्र शासनाचेही यांच्या किमतीवरील नियंत्रण दिनांक ३०.०६.२०२० नंतर संपुष्टात आल्याने, पुन्हा त्यांच्या किमतीत वाढ झाल्याचे निदर्शनास आले व अंतिमत: याचा भूर्दंड सर्व सामान्य जनतेला भोगावा लागत असल्याचे निदर्शनास आले.

साथरोग आटोक्यात आणण्यासाठी याचा उपयोग आवश्यक असल्याने, हॅण्ड सॅनिटायझर व मास्क (२ प्लाय, ३ प्लाय व एन ९५) यांच्या किमती नियंत्रणात ठेवणे जनहितार्थ आवश्यक होते.

संदर्भ क्र. ६ मध्ये नमूद दिनांक ३१.०७.२०२० च्या शासन निर्णयानुसार हॅण्ड सॅनिटायझर व मास्कचे दर निश्चित करण्यासाठी समिती स्थापन करण्यात आली होती. तद्नंतर सदर प्रकरणी मा. मंत्री (आरोग्य) व मा. मंत्री (अन्न व औषध प्रशासन) यांच्या संयुक्त बैठकीत राज्यात साथरोग कायद्यानुसार सार्वजनिक आरोग्य विभागाने मास्कचे दर नियंत्रण करण्याबाबत पुढील कार्यवाही करण्याचे निश्चित करण्यात आले. सदर समितीने दर निश्चित करण्यापूर्वी उत्पादक कंपन्यांशी चर्चा केली. उत्पादक, पुरवठादार व वितरक यांचे उत्पादन क्षेत्र, कार्यालय, गोदाम यांना प्रत्यक्ष भेट देणे, तपासणी करणे, आवश्यकतेनुसार उत्पादनाशी निगडीत कागदपत्रांची तपासणी करणे आवश्यक असल्याने, संदर्भ क्र. ७ मध्ये नमूद दिनांक २८.०८.२०२० च्या शासन आदेशानुसार मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी, मुंबई तसेच सह आयुक्त (तपासणी ब) वस्तु व सेवा कर, मुंबई यांना साथरोग कायद्यानुसार, प्राधिकृत करण्यात आले. त्यानुसार प्राधिकृत अधिकाऱ्यांनी उत्पादन क्षेत्राला/कार्यालयाला प्रत्यक्ष भेट दिली. तसेच उत्पादित मालाच्या उत्पादनाचा खर्च व त्याची नक्त किंमत परिव्यय लेखा परिक्षक (Cost Auditor) च्या सहाय्याने निर्धारित केली आहे.

उत्पादकाची उत्पाद किंमत, त्यावरील नफा तसेच प्रत्येकी वितरक व विक्रेता यांचा नफा गृहीत धरुन समितीने दर्जानुसार मास्कचे अधिकतम विक्री मुल्य प्रस्तावित केल्याचे अहवालात नमूद केले आहे. त्यानुसार राज्यात मास्कची (२ प्लाय, ३ प्लाय व एन ९५) दर निश्चिती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनआता खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**<u>शासन निर्णय</u> :-**

१) कोवीड प्रतिबंधात्मक उपाययोजनेचा भाग म्हणून मास्कचा वापर अनिवार्य असून सर्व सामान्य नागरिकांना परवडणाऱ्या दरात मास्क उपलब्ध करून देण्यासाठी मास्कची दर्जानुसार (२ प्लाय, ३ प्लाय व एन ९५) खालील प्रमाणे महाराष्ट्र राज्यातील अधिकतम विक्री मुल्य निश्चित करण्यात येत आहे.

| No | Description of Mask | MRP per piece + GST (In Rupees) |
|---|---|---|
| **1** | ▪NIOSH certified N-95 V shape (Including *Magnum N-95 V shape mask) | 19 |
| **2** | ▪NIOSH certified N-95 3D mask (Including *Magnum N-95 MH 3D mask) | 25 |
| **3** | ▪NIOSH certified N-95 without valve (including #Venus 14488 V4400-N-95 mask without valve ) | 28 |
| **4** | **▪NIOSH certified N-95 cup shape without valve** | |
| **a** | *Magnum N-95 MH cup | 49 |
| **b** | #Venus CN95+ N-95 cup shape mask without valve | 29 |
| **c** | #Venus 713W-N-95-6WE cup style without valve | 37 |
| **d** | #Venus 723W-N-95-6RE cup style without valve | 29 |
| **5** | °FFP2 Mask: ISI certified (including #Venus 14491 V-4420+ FFP2 mask) | 12 |
| **6** | 2 Ply surgical with loop or tie | 3 |
| **7** | 3 Ply surgical with Melt Blown (including #Venus 14520-3 Ply Mask) | 4 |
| **8** | Doctors kit of 5 N-95 masks + 5 3Ply melt blown mask (including #Venus doctors kit) | 127 |

***▪NIOSH:*** ***National Institute for Occupational Safety and Health, USA.***
****Magnum:*** ***Magnum Health & safety Pvt. Ltd.***
***# Venus:*** ***Venus Health & safety Pvt. Ltd.***
***° FFP:*** ***Filtering face piece***

२) या शसन निर्णयानुसार उपरोक्त विविध दर्जाच्या मास्कची विहित केलेली अधिकतम विक्री मुल्य मर्यादा साथरोग कायदा अंमलात असेपर्यंत लागू राहील.

३) सदर अधिकतम विक्री मुल्य मर्यादा राज्यातील सर्व मास्क उत्पादक कंपन्या/वितरक/किरकोळ विक्रेते यांना लागू राहील.

४) राज्यातील सर्व मास्क उत्पादक कंपन्या/वितरक/किरकोळ विक्रेते यांनी मास्कचा दर्जा व त्याची निर्धारित कमाल विक्री किंमत दर्शनी भागावर लावणे आवश्यक राहील.

५) या प्रकरणी काही तक्रार उद्भवल्यास, राज्य स्तरावर आयुक्त, अन्न व औषध प्रशासन व जिल्हा स्तरावर, जिल्हाधिकारी हे तक्रार निवारणासाठी सक्षम प्राधिकारी असतील.

६) राज्यातील मास्कची आवश्यकता लक्षात घेता, उत्पादकाने राज्यात उत्पादित केलेला व राज्यात आवश्यक असलेला माल विहित दराने उपलब्ध करुन देणे आवश्यक राहील.

७) रुग्ण सेवा देणाऱ्या महाराष्ट्रातील शासकीय व खाजगी रुग्णालये/नर्सिंक होम/कोवीड केअर सेंटर/डेडीकेटेड कोवीड हॉस्पिटल्स इ. यांना मास्कचा पुरवठा करताना मास्कच्या विहित अधिकतम विक्री मुल्य मर्यादेच्या ७० टक्के दराने उपलब्ध करून देणे आवश्यक राहील. व खाजगी रुग्णालयांनी उपरोक्त दराने मास्कची खरेदी केल्यानंतर खरेदी किंमतीच्या ११० टक्के पेक्षा जास्त रक्कम रुग्णांकडून आकारता येणार नाही.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावार उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२००९०८११३५२४३७१७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

(डॉ. प्रदीप व्यास)
प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५) सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
७) आयुक्त, अन्न व औषध प्रशासन, मुंबई.
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी, मुंबई.
९) व्यवस्थापकीय संचालक, हाफकीन बायो फार्मास्युटीकल लि. मुंबई.
१०) सह आयुक्त (तपासणी-ब), वस्तू व सेवा कर, मुंबई.
११) सह आयुक्त, मुख्यालय, अन्न व औषध प्रशासन तथा, राज्य औषध नियंत्रण प्राधिकारी, अन्न व औषध प्रशासन, मुंबई.
१२) जिल्हाधिकारी (सर्व).
१३) महानगरपालिका आयुक्त (सर्व).
१४) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई व पुणे.
१३) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
१४) जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय (सर्व).
१५) अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व संलग्न रुग्णालये (सर्व)
१६) जिल्हा आरोग्य अधिकारी (सर्व).
१७) निवड नस्ती (आरोग्य-५)

प्रत माहितीस्तव

१) मा. मंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. मंत्री (अन्न व औषध प्रशासन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. राज्यमंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. राज्यमंत्री (अन्न व औषध प्रशासन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.